आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत संजय गांधी निराधार अनुदान योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत... **(लेखाशिर्ष २२३५सी१६१)**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र.६ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२०.

वाचा -

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष विभाग क्र.विसयो २०१०/प्र.क्र.१७५/ विसयो-२, दि.२६.१०.२०१०.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.०१.०४.२०१९.
३) शासन निर्णय, आ.वि.वि. क्र. बीयुडी-२०१९/प्र.क्र.६/कार्यासन-६, दि. ०९.०५.२०१९.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.
५) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी २०१९/प्र.क्र.६/कार्यासन-६, दि.२९.०७.२०१९.
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाची नस्ती क्र.संगायो-२०१९/प्र.क्र.४५/विसयो

**शासन निर्णय-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टी-५,२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण,७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत (०२)(०३) संजय गांधी निराधार योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी १६१), या लेखाशिर्षांखाली २०१९-२० साठी रु. ६५८५०० हजार, एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर निधीतून संदर्भाधीन क्र. ३ व ५ येथील शासन निर्णयान्वये एकूण अर्थसंकल्पीत निधीपैकी ६०% मर्यादेत निधी वितरीत करण्यात आला आहे. आता वित्त विभागाने सदर एकूण अर्थसंकल्पीत निधीपैकी १००% मर्यादेत निधी वितरित करण्यास मान्यता दिली आहे.

यानुषंगाने सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाने वाचा क्र.६ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी खालीलप्रमाणे निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

(रु.हजारात)

| अ. क्र. | मागणी क्रमांक / मुख्य लेखाशिर्ष /योजनेचे नाव | बाब/उद्दिष्ट | सन २०१९-२० साठीची अर्थसंकल्पीय तरतूद | ६० टक्के वितरित तरतुद वजा जाता १००% च्या मर्यादेत वितरित करावयाची तरतुद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | मागणी क्र. टी-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना | | | |
| १ | (०२)(०३) संजय गांधी निराधार अनुदान योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी१६१), | ५०- इतर खर्च | ६५८५००.०० | २६३४००.०० |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभागप्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय

अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.४ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०६१७११०३२३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.02.15 14:42:42 +05'30'

रविंद्र दि.औटे

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे
६. सर्व प्रकल्प, अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. कार्यासन क्र.१२/ निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.